सहायक भूवैज्ञानिक तसेच कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना जलस्वराज्य प्रकल्प-२ कार्यक्रमांतर्गत भूवैज्ञानिक या पदावर प्रतिनियुक्ती देण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन आदेश क्रमांकः आपना २०१४/प्र.क्र.१५७/पापु-१५**

गो.ते.रूग्णालय, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४००००१.
तारीख: १० ऑगस्ट, २०१५

संदर्भ :-

१) **शासन निर्णय, पा.पु.व स्व.वि. क्र. जस्वप्र-०११४/प्र.क्र.०६/पापु-११, दिनांक ७/२/२०१४**

२) **शासन निर्णय,पा.पु.व स्व.वि. क्र. जस्वप्र-०११४/प्र.क्र.२८/पापु-११, दिनांक १०/२/२०१४**

३) **प्रशासन अधिकारी,भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र. प्रशासन/आस्था-१/जलस्वराज्य/प्र.क्र.४७/३२६/२०१५, दिनांक २९ मे, २०१५**

४) **पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग पत्र क्र. जस्वप्र १२१४/प्र.क्र.२८०/पापु-११, दिनांक २९ जून, २०१५**

प्रस्तावना :-

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निर्माण करण्यात आलेल्या पदांपैकी संदर्भ क्र.३ येथील पत्रामध्ये नमूद केलेल्या एक सहायक भूवैज्ञानिक व एक कनिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांची जलस्वराज्य प्रकल्प-२ कार्यक्रमांतर्गत असलेल्या जिल्हा स्तरावरील औरंगाबाद व सातारा येथील वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालयासाठी भूवैज्ञानिक या पदावर प्रतिनियुक्ती देण्यासाठी निवड झालेली असल्याने त्यांचे प्रतिनियुक्तीचे आदेश काढण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन आदेश:-**

संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयाद्वारे निर्माण करण्यात आलेल्या जिल्हा स्तरावरील औरंगाबाद व सातारा येथील वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालयासाठी असलेल्या भूवैज्ञानिक या पदावर ते त्यांच्या सध्याच्या पदावर ज्या वेतनश्रेणीत जे वेतनमान घेत आहेत, त्याच वेतनश्रेणीत, त्याच वेतनमानात तीन वर्षाच्या कालावधीसाठी किंवा जलस्वराज्य प्रकल्प-२ या कार्यक्रमाच्या कालावधीपुरती, यापैकी जे आधी घडेल त्या कालावधीपर्यंत खालील सहायक भूवैज्ञानिक तसेच कनिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या प्रतिनियुक्तीस शासन मान्यता देत आहे.

| अ. क्र. | नाव,पदनाम व सध्याची वेतनश्रेणी आणि ग्रेड वेतन | सध्याचे कार्यालय | प्रतिनियुक्तीचे पदनाम | वेतनश्रेणी व ग्रेड वेतन | प्रतिनियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. विलासराव ना. भोसले सहायक भूवैज्ञानिक, रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५७०० | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा | भूवैज्ञानिक | सध्याची वेतनश्रेणी व ग्रेड वेतन | वरिष्ठ भूवैज्ञानिक, जलस्वराज्य-२ कार्यक्रम, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, सातारा |
| २ | श्री. एस.जी.जैन कनिष्ठ भूवैज्ञानिक, रू.१५६००-३९१०० ग्रेड वेतन रू.५००० | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद | भूवैज्ञानिक | सध्याची वेतनश्रेणी व ग्रेड वेतन | वरिष्ठ भूवैज्ञानिक, जलस्वराज्य-२ कार्यक्रम, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद |

२. सदर अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील भूवैज्ञानिक या पदासंदर्भातील सेवेच्या अटी व शर्ती तसेच कर्तव्ये व जबाबदाऱ्या संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार राहतील.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०७११३१००२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deepak Laxman Pimple

Digitally signed by Deepak Laxman Pimple
DN: CN = Deepak Laxman Pimple, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.08.10 12:23:43 +05'30'

**( दिपक ल. पिंपळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. उपसचिव तथा प्रकल्प संचालक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, सु.स.प्र.व्य.कक्ष, सिडको भवन, नवी मुंबई.

३. अवर सचिव (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.

५. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (औरंगाबाद, पुणे )

६. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद/सातारा.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/ सातारा.

८. सहायक संचालक, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा, पुणे

९. संबंधित सहायक / कनिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा,(संचालकांमार्फत)

१०.निवडनस्ती पापु-१५